**राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके अंतर्गत सन २०१९-२० मध्ये ऊसामधील कडधान्य आंतरपिक पध्दतीस चालना देण्याकरिता रु.८.५१७ लाख निधी अनुसूचित जाती प्रवर्गासाठी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राअसु-२०२०/प्र.क्र.०५/४-अे.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०७ फेब्रुवारी, २०२०

<u>संदर्भ:-</u>

१. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.२-९/२०१५ –CU-IV दि. ०९/०४/२०१९.
२. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. अेअेपी-२०१९/प्र.क्र.२२/४-अे, दि.०३/०६/२०१९.
३. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.D.१-३/२०१९-२०/NFSM-१/२७२१, दि.२९/१०/२०१९
४. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.३-१०/२०१९/NFSM, दि.२०/११/२०१९
५. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/विप्र३/राअसुअ/ऊस-आंतरपिक/६५८६/२०१९, दि.२५/११/२०१९
६. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. राअसु-१०१९/प्र.क्र.१०३/४-अे, दि.३०/१२/२०१९
७. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.वि.प्र.३/राअसुअ/ऊस आंतरपीक/३/२०, दि.०२/०१/२०२०

<u>प्रस्तावना :-</u>

सन २०१९-२० करिता केंद्र शासनाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत वाणिज्यिक पिकांकरीता (कापूस, ऊस) संदर्भ क्र.१ येथील दि.०९/०४/२०१९ च्या पत्रान्वये ₹८७२.५८ लाख रकमेचा कृती आराखडा मंजूर केला असून त्यानुसार ₹८७२.५८ लाख (केंद्र हिस्सा रु.५२३.५५ लाख + राज्य हिस्सा रु.३४९.०३ लाख) रकमेच्या कृती आराखडयास संदर्भ क्र.२ येथील दि.०३ जून २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे.

सन २०१९-२० मध्ये केंद्र शासनाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके अंतर्गत ऊसामधील कडधान्य आंतरपिक पध्दतीस चालना देण्याकरिता संदर्भ क्र.३ येथील दि. २९/१०/२०१९ च्या पत्रान्वये रु.८३.४४६ लाख (केंद्र हिस्सा रु.५०.०६८ लाख + राज्य हिस्सा रु.३३.३७८ लाख) रकमेचा कृती आराखडयास मंजूरी दिली आहे. त्यास संदर्भ क्र.६ येथील दि.३०/१२/२०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

केंद्र शासनाच्या संदर्भ क्र.४ येथील दि.२०/११/२०१९ च्या पत्रान्वये सन २०१९-२० मध्ये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके अंतर्गत ऊसामधील कडधान्य आंतरपिक पध्दतीस चालना देण्याकरिता रु.५०.०६ लाख इतका निधी उपलब्ध करुन दिला आहे. त्यानुसार कृषि आयुक्तालयाच्या मागणीप्रमाणे अनुसूचित जाती प्रवर्गाकरिता केंद्र व राज्य हिस्स्याचा आवश्यक निधी वितरीत करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः**

१. सन २०१९-२० मध्ये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके अंतर्गत ऊस या पिकामधील कडधान्य आंतरपिक पध्दतीस चालना देण्याकरिता **अनुसूचित जाती प्रवर्गाकरिता** केंद्र व राज्य हिस्स्याचा एकूण ₹८.५१७ लाख निधी (रुपये आठ लाख एक्कावन हजार सातशे फक्त) आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर निधीचे केंद्र व राज्य हिस्स्याचे विवरण पुढीलप्रमाणे आहे:-

**₹ (लाखात)**

| केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | एकूण वितरीत निधी |
|---|---|---|
| ५.११ | ३.४०७ | ८.५१७ |

२. राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके अंतर्गत ऊसामधील कडधान्य आंतरपिक पध्दतीस चालना देण्याकरिता केंद्र हिस्स्याचा ₹५.११ लाख निधी ( रुपये पाच लाख अकरा हजार फक्त) आणि राज्य हिस्स्याचा ₹३.४०७ लाख (रुपये तीन लाख चाळीस हजार सातशे फक्त) निधी खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०१९-२० करिता अथर्संकल्पीत करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

| अनुसूचित जाती प्रवर्ग | |
|---|---|
| ऊस | |
| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
| **मागणी क्रमांक डी-३**<br>२४०१- पीक संवर्धन<br>१०८ वाणिज्यीक पिके<br>(००) (७८९) अनुसूचित जाती उपयोजना,<br>(०२) (०७)राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- ऊस<br>(केंद्र हिस्सा ६०%)<br>(केंद्र पुरस्कृत योजना) (२४०१A१८१)<br>(योजनांतर्गत) (दत्तमत) ३३, अर्थसहाय्य | **मागणी क्रमांक डी-३**<br>२४०१- पीक संवर्धन<br>१०८, वाणिज्यीक पिके<br>(००)( ७८९)अनुसूचित जाती उपयोजना,<br>(०२) (०८)राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- ऊस<br>(राज्य हिस्सा ४०%)<br>(केंद्र पुरस्कृत योजना) (२४०१A१९२)<br>(योजनांतर्गत) (दत्तमत) ३३, अर्थसहाय्य |

३. शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके अंतर्गत ऊसामधील कडधान्य आंतरपिक पध्दतीस चालना दिलेल्या एकूण रु.८.५१७ लाख निधी संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी PFMS प्रणालीद्वारे जिल्हा निहाय वितरीत करावा.

४. सन २०१९-२० मध्ये राज्यात सदर अभियानाची अमंलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने निधी आहरण व वितरण करणेसाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संवितरण आधिकारी** |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |
| २ | जिल्हा स्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |

५. केंद्र शासनाचे निर्देशानुसार सदर रु.८.५१७ लाख रकमेच्या कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२०७१५२९५६०८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ZENDAGE MAHAVEER BALASAHEB

Digitally signed by ZENDAGE MAHAVEER BALASAHEB
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a9503a5209c984c11d292912b642bdfd32282e4276fb5541f4f92f23cb110d23, postalCode=400032, street=MADAM CAMA ROAD,MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=43d7bb272129cd1382853268481cb2ceee1f236d393acecb71084bc36ffeed02, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ZENDAGE MAHAVEER BALASAHEB
Date: 2020.02.07 15:34:53 +05'30'

**(महावीर झेंडगे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
१२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१३. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१४. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१५. महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.

१६. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१९. सहायक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, पुणे
२०. वित्त विभाग, कार्यासन ( व्यय-१ / अर्थसंकल्प -१३), मंत्रालय, मुंबई
२१. निवड नस्ती.